अपंग मुलांना प्राथमिक व माध्यमिक शाळेत
प्रवेशासाठी आरक्षण

महाराष्ट्र शासन

शालेय शिक्षण विभाग
शासन निर्णय क्र.अपंग 1020/2372/प्राशि 1/
मंत्रालय विस्तारभवन, मुंबई 32
दिनांक 27 एप्रिल, 2001

शासन निर्णय

राष्ट्रीय शैक्षणिक धोरणानुसार अपंग मुलांना नियमित शाळेत दाखल करणे आवश्यक आहे. अपंग मुलांना विशेष शाळांमधून शिक्षण देण्यापेक्षा नियमित शाळांतून एकात्मिक शिक्षण दिल्यास ते अधिक हितकारक आहे. अपंग व्यक्तींसाठी केंद्र शासनाने अपंग व्यक्ती समान संधी, हक्कांचे संरक्षण आणि संपूर्ण सहभाग अधिनियम 1995 लागू केला आहे. या अधिनियमानुसारही अपंग मुलांना नियमित शाळापध्दतीमध्ये दाखल करुन घेणे आवश्यक आहे. अपंग मुलांच्या शैक्षणिक हिताच्या द्रष्टीने स्थानिक स्वराज्य संस्थांच्या तसेच मान्यताप्राप्त खाजगी संस्थांच्या प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमध्ये अपंग मुलांना प्रवेशासाठी 3 टक्के जागा राखून ठेवण्यात येत आहेत. यापुढे प्रवेशासाठी उपलब्ध असलेल्या किमान 3 टक्के जागांवर अपंग मुलांना प्रवेश देण्यात यावा. प्रवेश देण्याच्या अखेरच्या दिवसापर्यंत प्रवेश घेवू इच्छिणा-या अपंग मुलांना प्रवेश दिल्यानंतर 3 टक्के आरक्षणापैकी जागा रिक्त राहिल्या तर त्यावर अन्य मुलांना प्रवेश देण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

शा.पा. जोशी
उपसचिव, महाराष्ट्र शासन

GR - 20020925115520001500